अनुसूचित जाती , विमुक्त जाती, भटक्या जमाती,इतर मागासवर्ग व विशेष मागासप्रवर्गाच्या उमेदवारांना शासन सेवेत, निमशासकीय सेवेत, शासन अंगीकृत संस्थामध्ये पदोन्नती पुर्वी जाती प्रमाणपत्राची पडताळणी करुन वैधता प्रमाणपत्र सादर करण्याबाबत मार्गदर्शक सूचना

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन परिपत्रक :-सीबीसी-१०/२०१०/प्र.क्र.४७ /मावक-५,**
**मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक :- २६ मार्च, २०१०**

वाचा :- १) शासन निर्णय , विमुक्त जाती, भटक्या जमाती , इतर मागासवर्ग आणि विशेष मागासप्रवर्ग विभाग क्रमांक :- सीबीसी-१२/२००२/२५२/प्र.क्र.१/इमाव-५, दिनांक २५ जानेवारी, २०००

२) शासन परिपत्रक ,सामाजिक न्याय,सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक :-सीबीसी-१०/२००४/प्र.क्र. ५७० /मावक-५, दिनांक ५ मार्च , २००५.

३) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक :-बीसीसी-२००९/प्र.क्र.२९१/०९/१६ ब , दि. ०५नोव्हेंबर, २००९

**प्रस्तावना :-** अनुसूचित जाती , विमुक्त जाती, भटक्या जमाती , इतर मागासवर्ग व विशेष मागासप्रवर्गाच्या उमेदवारांना शासन सेवेत , निमशासकीय सेवेत, शासन अंगीकृत संस्थामध्ये पदोन्नतीपुर्वी जाती प्रमाणपत्राची पडताळणी करुन वैधता सादर करण्याबाबत मार्गदर्शक सूचना उपरोक्त संदर्भाधीन क्रमांक - २ दिनांक ०५/०३/२००५ च्या शासन परिपत्रकान्वये निर्गमित करण्यात आलेल्या होत्या. तथापि सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक-३ दिनांक ०५ नोव्हेंबर, २००९ च्या शासन निर्णयातील परिच्छेद ७ मध्ये " **मागासप्रवर्गाच्या उमेदवारांना नियुक्ती अथवा पदोन्नती देत असताना जात वैधता प्रमाणपत्र असल्याखेरीज या पुढे नियुक्ती अथवा पदोन्नती देण्यात येऊ नये.** " असे आदेश पारीत केलेले आहेत. त्यामुळे दोन्ही आदेशामधील तरतूदीचे पालन करण्याबाबत क्षेत्रीय अधिका-यांमध्ये संभ्रमाची स्थिती निर्माण झाली आहे. याबाबत सुस्पष्ट असे आदेश सर्व संबंधितांना देण्याची आवश्यकता असल्याने सामाजिक न्याय विभागाच्या संदर्भ क्रमांक-२ दिनांक ०५/०३/२००५ च्या आदेशामध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक** :- शासकीय / निमशासकीय वा तत्सम सेवेत सरळसेवेने प्रवेश तसेच पदोन्नतीबाबतच्या सूचना शासन परिपत्रक दिनांक ०५ मार्च, २००५ अन्वये निर्गमित करण्यात आल्या होत्या. सदरचे

परिपत्रक आता अधिक्रमित करण्यात येत असून त्याऐवजी खालील प्रमाणे सुधारीत आदेश देण्यात येत आहेत :-

अनुसूचित जाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागासप्रवर्गाच्या उमेदवारांची शासकीय वा निमशासकीय कार्यालये, शासकीय उपक्रमातील सांविधानिक संस्था / जिल्हा परिषदा / नगर परिषदा / नगरपालिका / महानगरपालिका / ग्रामपंचायत / मंडळे / महामंडळे / शासनाचे अंगीकृत व्यवसाय / विद्यापीठे /शासकीय शिक्षण संस्था आश्रमशाळासह /सहकारी संस्था / बँका / सहकारी बँका / सहाय्यक अनुदान मिळणा-या शासनमान्य स्वेच्छा संस्था यांच्यासह अन्य ज्या-ज्या प्रकारच्या संस्था व कार्यालये यांना राज्याच्या तिजोरीतून निधी / अनुदान / सहाय्यक अनुदान मिळते अशा सर्वप्रकारच्या संस्था / मंडळे येथे निवड मंडळामार्फत / निवड समितीमार्फत / विविध निवड मंडळे / लोकसेवा आयोगामार्फत राखीव असलेल्या पदावर शिफारस झालेल्या / निवड केलेल्या उमेदवारांचे जाती प्रमाणपत्र पडताळणी करण्याबाबत आवश्यक त्या कागदपत्राची पुर्तता करण्यासाठी नियुक्ती प्राधिका-यांनी उमेदवारांना तात्काळ कळवावे व संबंधीत उमेदवारांनी त्यांच्या जाती दाव्या प्रित्यर्थ आवश्यक त्या कागदपत्राची पूर्तता एक महिन्याच्या आत संबंधीत प्राधिका-याकडे करावी. कागदपत्राची पुर्तता झाल्यानंतर विभागाने / कार्यालयाने तात्काळ संबंधीत जाती प्रमाणपत्र पडताळणी समितीकडे कागदपत्रे पुढील कार्यवाहीसाठी पाठवावीत.

२. जाती प्रमाणपत्र पडताळणी समितीने आवश्यक ती कागदपत्रे प्राप्त झाल्यानंतर ३ महिन्याच्या आत जाती दाव्याचा समितीचा निर्णय संबधीत आस्थापनेस कळवावा. संबंधीत उमेदवाराच्या जातीचा दावा **वैध असल्याबाबतचा समितीचा निर्णय प्राप्त झाल्यानंतर** संबंधित आस्थापनेने उमेदवारास नियुक्ती द्यावी.

३. ज्या मागासवर्गीय कर्मचारी व अधिका-यांची जाती प्रमाणपत्राची पडताळणी अद्यापि झालेली नाही व सद्यस्थितीत पदोन्नतीच्या क्षेत्रात (Zone of Consideration ) येत असतील असे अधिकारी व कर्मचा-यांचे पदोन्नतीच्या प्रक्रियेपुर्वी ६ महिने अगोदर सर्व प्रशासकीय विभागाने जाती प्रमाणपत्रे, जात प्रमाणपत्र पडताळणी समितीकडे पाठवून **जातीचे वैध प्रमाणपत्रे** प्राप्त करुन घ्यावीत व नंतरच त्यांना पदोन्नती देण्यात यावी.

४. सदरचे परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असुन त्याचा संगणक संकेतांक **२०१००३२६१८४१३८००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( सतीश गवई )**
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,
मा. राज्यपाल यांचे सचिव,

D:\2010 bcw-5/gr2010.lwp

मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
मा. मंत्री / राज्यमंत्री (सामाजिक न्याय व वि.जा.भ.ज ) यांचे खाजगी सचिव
प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व विभागीय आयुक्त
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
*प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई / नगापूर / औरंगाबाद.
*प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई / नगापूर / औरंगाबाद.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.* पत्राद्वारे.

यांना विनंती की, त्यांनी सदर परिपत्रकास व्यापक प्रसिध्दी द्यावी.

सर्व मंत्रालयीन विभाग,

त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी सदर आदेश त्यांचे अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख यांचे निदर्शनास आणून द्यावेत.

संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, विमुक्त जाती भटक्या जमाती व इतर मागासवर्ग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, माध्यमिक व उच्च माध्यमिक / प्राथमिक शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक, वैद्यकीय शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सर्व जिल्हाधिकारी तथा जिल्हा दंडाधिकारी
सदस्य सचिव तथा संशोधन अधिकारी, सर्व विभागीय जाती प्रमाणपत्र पडताळणी समित्या १ व २,
विभागीय समाजकल्याण अधिकारी यांचे कार्यालय, नवी मुंबई, पुणे, नाशिक, औरंगाबाद, नागपुर, अमरावती, लातुर
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी /सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
आयुक्त, सर्व महानगर पालिका
मुख्याधिकारी, सर्व नगरपालिका
सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई /पुणे / कोल्हापूर /नागपूर / अमरावती / नाशिक / औरंगाबाद
सर्व जिल्हा परिषदांचे शिक्षणाधिकारी / माध्यमिक / प्राथमिक
शिक्षण निरीक्षक , बृहन्मुंबई / शिक्षणाधिकारी , बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई
सर्व कार्यासने, सा.न्या. व वि.स. विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती, का मावक-५

************************************